**मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३अे (एमयुटीपी-३ए) प्रकल्पासाठी राज्य शासनाच्या अर्थसहाय्याची रक्कम मुंबई रेल्वे विकास महामंडळास प्रदान करण्याबाबत (सन २०२४-२५)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२४/प्र.क्र.७४/नवि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० फेब्रुवारी, २०२५.

**पहा :-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एनएमआर-३३१८/प्र.क्र.१४५/नवि-७, दि.१४.०१.२०१९.
२. गृहनिर्माण व शहरी कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे K-१४०११/०६/२०१९-MRT, दि.२९.१२.२०२२ रोजीचे पत्र.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. ३३१८/प्र.क्र.१४५/नवि-७, दि.१२.०५.२०२३.
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. ३३२३/प्र.क्र.६२/नवि-७, दि.२२.०९.२०२३.
५. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दि. ०१ एप्रिल, २०२४.
६. शासन समक्रमांक दि.१९.०८.२०२४ व दि.२७.११.२०२४ रोजीचे शासन निर्णय.

**प्रस्तावना :**

मुंबई रेल्वे विकास कॉर्पोरेशन लिमिटेड, मुंबई यांनी मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३अे (MUTP-3A) अंतर्गत प्रस्तावित केलेल्या रु.५४७७७ कोटी प्रकल्प पूर्णत्व खर्चाच्या विविध कामांना राज्य शासनाच्यावतीने ५० टक्के आर्थिक सहभाग देण्यास नगर विकास विभाग शासन निर्णय दिनांक ५ डिसेंबर, २०१८ अन्वये मान्यता देण्यात आली होती. सदर प्रकल्पास रेल्वे मंत्रालय, भारत सरकार यांनी दि. ०१.०४.२०१९ रोजी एमयुटीपी-३अ प्रकल्पास मान्यता प्रदान केली आहे. केंद्र शासनाने सदर प्रकल्पात प्रस्तावित घटक प्रकल्प - हार्बर मार्गावरील सीएसएमटी-पनवेल दरम्यान जलद उन्नत मार्ग (अंदाजित खर्च रु.१२३३१ कोटी) व विरार-वसई-पनवेल नवीन उपनगरीय मार्ग (अंदाजित खर्च रु.७१८४ कोटी) हे दोन घटक प्रकल्प वगळले तसेच २१० ऐवजी १९१ रेल्वे गाड्यांची खरेदी (रु. १५७२ कोटीची) अशी सुधारणा केली आहे. अशाप्रकारे एकूण प्रकल्प खर्चात सुधारणा होऊन एकूण रु.३३,६९० कोटी इतक्या प्रकल्प पुर्णत्व खर्चाच्या उर्वरीत घटक प्रकल्पांच्या अंमलबजावणीस केंद्र शासनाकडून मान्यता देण्यात आली आहे. यामुळे सदर प्रकल्पातील केंद्र व राज्य शासनाच्या वित्तीय सहभाग आराखडा सुधारीत होत असल्याने नगर विकास विभाग शासन निर्णय दिनांक ०५.१२.२०१८ अधिक्रमित करून मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३अे प्रकल्पास दि.११.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे राज्य शासनाची सुधारीत मान्यता देण्यात आली आहे.

सदर प्रकल्पात राज्य शासनाचा हिस्सा देण्याच्या अनुषंगाने दिनांक २७ जुलै, २०२३ रोजी महाराष्ट्र शासन, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण व सिडको, नवी

मुंबई महानगरपालिका व मुंबई रेल्वे विकास महामंडळ यांच्यात वित्तीय करारनामा करण्यात आला आहे. मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३अे (एमयुटीपी-३ए) प्रकल्पात थेट राज्य शासनाकडून पहिल्या ४ वर्षात रु.१८८७.१५ कोटी व नंतरच्या ४ वर्षात रू.७४९८.४७ कोटी असे एकूण रू.९३८५.६२ कोटी इतके अनुदान द्यावयाचे आहे. सदर प्रकल्पाकरिता राज्य शासनाच्या हिश्श्यापोटी देय रक्कम वितरीत करण्याकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात रु.४७१ कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून **रु.१७१ कोटी** एमयुटीपी-३ए प्रकल्पाकरिता मुंबई रेल विकास महामंडळ (एमआरव्हिसी) यांना राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय -</u>**

१. मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३अे (एमयुटीपी-३ए) कार्यान्वित करण्यासाठी राज्य शासनाच्या हिश्श्याची रक्कम **रु.१७१ कोटी (अक्षरी रुपये एकशे एक्काहत्तर कोटी फक्त)** मुंबई रेल्वे विकास महामंडळास प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. एफ-५, ४२१७ नगर विकासावरील भांडवली खर्च, ६० इतर नगर विकास योजना, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांमधील गुंतवणूका, (००) (०१) मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३अे (एमयुटीपी-३ए) प्रकल्पासाठी मुंबई रेल्वे विकास महामंडळास राज्य शासनाचे अर्थसहाय्य, ५४ गुंतवणुका (४२१७०८६४)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी. सदर निधी वितरण हे **बिनशर्त** स्वरुपाचे आहे.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव न.वि.-५, नगर विकास विभाग मंत्रालय मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयातील निर्णय क्र.१ मध्ये नमूद करण्यात आलेली रू.१७१ कोटी रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून काढून ती **मुंबई रेल्वे विकास महामंडळास** देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोख शाखेने देयक तयार करुन ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि-३१ कार्यासनाने करावी.

४. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई रेल्वे विकास महामंडळ यांनी राज्यशासनाकडून त्यांना वितरित केलेली **रु. १७१ कोटी** रक्कम महामंडळाकडे जमा झाल्याचे दिनांकासह प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई रेल्वे विकास महामंडळ यांनी राज्यशासन/एमएमआरडीए/ सिडको/बृहन्मुंबई मनपा/नवी मुंबई मनपा इ. कडून प्राप्त होणाऱ्या निधीबाबतचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

६. सदर रक्कम ज्या प्रयोजनाकरिता मंजूर केली आहे, त्याच प्रयोजनाकरिता खर्च करण्यात यावी.

७. राज्य शासनाकडून मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३अे प्रकल्पाकरीता सदर आदेशान्वये वितरीत निधीची परिस्थिती खालीलप्रमाणे-

| अ.क्र. | दिनांक | रक्कम (रु.कोटी) | निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव | एकूण वितरीत निधी (रु.कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | १९.०८.२०२४ | २००.०० | राज्य शासन | २००.०० |
| २ | २७.११.२०२४ | १००.०० | राज्य शासन | ३००.०० |
| ३ | सदरचे वितरण | १७१.०० | राज्य शासन | **४७१.००** |

८. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ मधील संबंधित सर्व अटींचे तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.३३/व्यय-३,दि.०३.०२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सांकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१०१८३०१३२९२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB5BBF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.02.10 18:32:06 +05'30'

**(विजय चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, सिडको, नवी मुंबई.
आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, नवी मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, मुंबई रेल्वे विकास महामंडळ, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.

महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
अधिदान व लेखाधिकारी मुंबई.
कक्ष अधिकारी, व्यय-३/अर्थसंकल्प-१६/अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, कार्यासन १४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सह सचिव, नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी, नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
रोख शाखा (३ प्रती),
निवड नस्ती, नवि-७.